**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील "शरीरविकृती शास्त्रज्ञ" या संवर्गात नामनिर्देशन कोट्यातील पदावर देण्यात आलेली अभावित पदोन्नती आता पदोन्नतीच्या कोट्यातील पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११९/प्र.क्र.३०३/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २४ नोव्हेंबर, २०२०

**वाचा** - १. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.पदोन्न-११०९/प्र.क्र.६६/सेवा-२, दि.०२.०६.२०११
२. सामान्य प्रशासन विभाग पत्र क्रमांक-बीसीसी-२०१७/प्र.क्र. ३१२ अे/१६-ब, दि.२९.१२.२०१७.
३.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९
४. शासन आदेश क्र.पदोन्न-१११९/प्र.क्र.३०३/सेवा-२, दि.२७.१०.२०२०

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील डॉ. मिलिंद म. कुलकर्णी व डॉ. (श्रीमती) रेखा गो. गायकवाड (मुदखेडकर) या वैद्यकीय अधिकाऱ्यांना (वेतन स्तर एस-२० : ५६१००-१७७५००) शासन निर्णय दि.०२.०६.२०११ अन्वये विशेषज्ञ संवर्गातील शरीरविकृती शास्त्रज्ञ (वेतन स्तर एस-२३: ६७७००-२०८७००) या संवर्गातील नामनिर्देशन कोट्यातील पदावर अभावित पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे. सदर अधिकाऱ्यांना नामनिर्देशन कोट्यातील पदावर देण्यात आलेली पदोन्नती आता या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून, पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. डॉ. मिलिंद म. कुलकर्णी व डॉ. (श्रीमती) रेखा गो. गायकवाड (मुदखेडकर) यांच्या पदस्थापनेमध्ये कोणताही बदल करण्यात आला नसून, ते सध्या कार्यरत असलेल्या ठिकाणीच कार्यरत राहतील.

२. सदर पदोन्नती विशेषज्ञ संवर्गातील "शरीरविकृती शास्त्रज्ञ" या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहे.

३. मा. उच्च न्यायालयाने पदोन्नतीचे आरक्षण रद्द करण्यासंदर्भातील याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरूद्ध राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा

याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केलेली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याअनुषंगाने सा. प्र. विभागाने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावी व अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा मार्गदर्शक सूचना दिल्या आहेत. त्यानुसार सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असून, सदर पदावर संबंधीतांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही. तसेच सदर पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११२३१६२०३३९४१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.11.24 16:12:54 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

४. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
७. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
८. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
९. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
१०. प्राचार्य, आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१४. मा. मंत्री (आरोग्य)/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई
१६. प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्विय सहायक
१७. सर्व सह सचिव/उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे मार्फत)
२०. निवडनस्ती सेवा-२